जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत बुलडाणा जिल्ह्यातील मौजे सिंदखेड व इतर ६ गावांच्या नळ पाणी पुरवठा योजनांच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेबाबत

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा - २०२२/प्र.क्र. १६४९/पापु १३

७ वा मजला, गोकुलदास तेजपाल रूग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक, मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: १७ मार्च,२०२३

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः जजीमि-२०२२/प्र.क्र. ८१/पापु-१०, दिनांक ०२ मे,२०२२
२) केंद्र शासन, जल शक्ती मंत्रालय, यांचे पत्र दि.२१.०६.२०२२ व दि .२८.०६.२०२२
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. बुलडाणा यांचे प्रशासकीय मान्यता आदेश क्र. बुजिप/ग्रापापुवि/तांशा/५०२२/२०२१, दि. ८.११.२०२१
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. बुलडाणा यांचे प्रशासकीय मान्यता आदेश क्र. बुजिप/ग्रापापूवि/तांशा/३७१/२०२२,दि. ८.०२.२०२२
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. बुलडाणा यांचे पत्र क्र. बुजिप/ग्रापापुवि/कार्या-१/तांशा-३/५२८४/२०२२,दिनांक १८.१०.२०२२

प्रस्तावना :-

जलजीवन मिशन कार्यक्रमातंर्गत संदर्भ क्र. ०५ येथील पत्रान्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,बुलडाणा यांनी बुलडाणा जिल्ह्यातील प्रस्तुत ०७ नळ पाणी पुरवठा योजनांच्या जादा दरांच्या निविदा स्वीकृतीमुळे योजनांच्या आराखड्यास व अंदाजपकास सुधारीत प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबतचे प्रस्ताव शासनास सादर केलेले आहेत. बुलडाणा जिल्ह्यातील सदर योजनांच्या आराखड्यास व अंदाजपत्रकास मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलडाणा यांच्या स्तरावर संदर्भ क्र. ०३ ते ०४ येथील आदेशान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केली असून सदर योजनांच्या जादा दरांच्या निविदा स्वीकृतीमुळे झालेली वाढ विचारात घेत, अधीक्षक अभियंता(प्र.), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अकोला / कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बुलडाणा यांनी सदर योजनांना सुधारित तांत्रिक मान्यता दिलेली आहे.

त्यानुषंगाने बुलडाणा जिल्ह्यातील प्रस्तुत ०७ नळ पाणी पुरवठा योजनांच्या आराखड्यास व अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

बुलडाणा जिल्ह्यातील खालील तक्त्यात नमूद केलेल्या प्रस्तुत ०७ नळ पाणी पुरवठा योजनांच्या अंदाजपत्रकास व आराखडयास सुधारीत प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

| अ.क्र. | योजनेचे नाव | सुधारित तांत्रिक मान्यता दिनांक | मुळ अंदाजपत्रकीय रक्कम | सुधारीत प्रशासकीय मान्यता द्यावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | मौ. सिंदखेड, ता. मोताळा | ०३.१०.२०२२ | १३०८५७७३ | १४६९३०७३ |
| २ | मौ. पिंपळगाव देवी, ता. मोताळा | ११.१०.२०२२ | १८९१९८५० | २१६३१००० |
| ३ | मौ. जनुना, ता. बुलढाणा | ०३.१०.२०२२ | १४०५०२२९ | १५७३७४२१ |
| ४ | मौ.तांदूलवाडी-ईस्लामपूर, ता.बुलढाणा | ०३.१०.२०२२ | १४८४३९६१ | १६६४५३२२ |
| ५ | मौ. साखळी खुर्द, ता. बुलढाणा | ०३.०१.२०२२ | ७४२०४६६ | ८२७२१७९ |
| ६ | मौ. डोमरुळ-टाकळी, ता. बुलढाणा | ०३.१०.२०२२ | १६१२६७७१ | १८१७६४९७ |
| ७ | मौ. तराडखेड,ता. बुलढाणा | ०३.१०.२०२२ | १६१९५५५० | १८०८०७६४ |

### अटी

१. सोबतच्या परिशिष्ट-अ नमुद सुधारीत किंमतीत उर्वरित सर्व कामे विहित मुदतीत पूर्ण करावीत.
२. या योजनेस सहमती दिलेल्या मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.
३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बुलडाणा यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच

संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी व अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरूस्त्या (विशेष दुरूस्त्या धरून) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यसाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

५. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने (संबंधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद) योजना हंस्तातरित करून घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

६. सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१ टक्के पाणी पुरवठा योजना या देखभाल दुरूस्ती अभावी, वीज देयक न भरल्यामुळे (Poor maintenance/nonpayment of electricity of bills) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. यास्तव सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वाढ करण्याची जबाबदारी संबंधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांची राहील.

७. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत केली जाणार नाही याची जबाबदारी जिल्हा परिषदेची राहील.

९. या योजनेस मूळ प्रशासकीय मान्यतेच्या तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देतांना नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

१०. सदरची निविदा प्रक्रिया योग्यप्रकारे पार पाडण्यात आली आहे, याची खातरजमा जिल्हा परिषद स्तरावर करण्यात यावी.

०२. उपरोक्त तक्त्यात नमुद केलेल्या बुलडाणा जिल्ह्यातील ०७ योजनांच्या सुधारीत किमंतीतील वाढीव खर्च हा मागणी क्र. वाय-०२, जिल्हा परिषद योजनांतर्गत अनुदाने (०२) (१५) नळाद्वारे पाणी पुरवठा योजना जलजीवन मिशन कार्यक्रम यासाठी अनुदान (केंपुयो-राज्य हिस्सा) (कार्यक्रम)३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) लेखाशीर्ष (२२१५ २०७१) या लेखाशीर्षाखालील मंजुर अनुदानातुन भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

०३. बुलडाणा जिल्ह्यातील प्रस्तुत ०७ योजनांना सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दिनांक १७.०४.२०१५ च्या क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२ या शासन

निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहेत.

०४ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२७१७३६४५३४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANI DEELIPRAO DEOKATE

Digitally signed by RANI DEELIPRAO DEOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b0869a90562f87b9afb32e69166c729b50fd795952e7aeb9091b613d5a868aa7, pseudonym=EBDDE6E6DC46959920B4201DA4C1EADA80A905B3, serialNumber=BBD64806F9A7A26899A43E3A95A0566B762C44B895D6316615D2932D87DEFEEE, cn=RANI DEELIPRAO DEOKATE
Date: 2023.03.17 17:09:34 +05'30'

**( राणी देवकत्ते )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/विधान परिषद.
४) मा. विधानमंडळ सदस्य (सर्व)
५) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
६) जिल्हाधिकारी, बुलडाणा.
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलडाणा.
८) महालेखापाल, लेखापरीक्षा महाराष्ट्र-२, नागपूर.
९) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई.
१०) अभियान संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई.
११) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, अमरावती.
१२) अधीक्षक अभियंता (प्र.), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, अकोला.
१३) संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
१४) आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
१५) वरिष्ठ भुवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
१६) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बुलडाणा.
१७) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

१८) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

१९) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

२०) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई.

२१) कार्यासने (पापु-०४ व २०), पा.पु. व स्व.वि., मंत्रालय, मुंबई-३२.

२२) निवडनस्ती कार्यासन पापु-१३.